ॐ श्रीगणेशाय नमः । भूशुण्डी सांगे देवेशांप्रत । गणेशतीर्थांत गणेश वसत । वामबाजूस सिद्धितीर्थ वर्तत । स्नानें त्यांत सिद्धि लाभे ।।१।। उजव्या बाजूस बुद्धितीर्थ असत । त्यांत स्नानें बुद्धि लाभत । त्यानंतर लक्षतीर्थ ख्यात । सिद्धि समीप ध्यानप्रद ।।२।। लाभतीर्थ बुद्धितीर्थ समीप असत । लाभप्रद तें अत्यंत । लाभतीर्थासन्निध विलसत । मयूरतीर्थ सर्वश्रुत ।।३।। त्यांत करितां स्नान । विविध मोह नाश पावून । लक्षाच्या समीप मौषक तीर्थ महान । स्नानें त्यांत अहंभाव हरे ।।४।। त्यापुढतीं मौद्गलतीर्थ वर्तत । गार्त्समदतीर्थ त्यापुढें दिसत । शुकतीर्थ त्यानंतर असत । दत्तात्रेयतीर्थ त्यापलीकडे ।।५।। अन्यही गाणपत्यांची विविध । तीर्थें येथ असती मुक्तिप्रद । त्यांचें विस्तारप्रमाण विशद । सांगतों संक्षेपें विचक्षणहो ।।६।। दहा धनुष्यें विस्तार । गणेशतीर्थाचा जाणा समग्र । त्याच्या अर्धा विस्तार । सिद्धिबुद्धितीर्थांचा ।।७।। अन्य सर्व तीर्थांचें प्रमाण । एक धनुष्य परिपूर्ण । त्या त्या गुरूंच्या शिष्यतीर्थांचें परिमाण । यवमात्र जाणा विबुध हो ।।८।। मयूरमूषकतीर्थांच्या पुढ्यांत । ब्रह्मप्रियतीर्थ ज्ञात । तैसेंचि मोदाचें प्रमोदाचें असत । तीर्थ योगप्रियाचेही ।।९।। अन्य गणांची मुख्य तीर्थें असत । तेथेंच ह्या परिसरांत । गणेश तीर्थें तीं ज्ञात । ऐसें जाणा पंचदेवांनो ।।१०।। दोनशें धनुष्यें अंतरावर । वक्रतुंडादींचीं क्षेत्रें दक्षिणोत्तर । गणेशाचे नाना अवतार । त्यांचीहीं तीर्थे येथ असती ।।११।। तेथ क्रम आतां सांगेन । पूर्वभागीं गणेश्वर संस्थित महान । वक्रतुंड एकदंत महोदर शोभन । गजानन तैसा बल्लाळ ।।१२।। हेरंब विघ्नेश भालचंद्र । ज्ञानेश शूर्पकर्ण मोदकर । चिंतामणि विनायक जे सुरेंद्र । विघ्नप बारा मुख्य असती ।।१३।। जे पश्चिम भागीं स्थित । त्यांची नांवें आतां सांगत । लंबोदर विकट विघ्नेश प्रख्यात । धूम्रवर्णक महागणपति ।।१४।।

तैसाचि सिद्धिविनायक थोर । ढुंढीश लक्ष आशाप्रपूरक विघ्नहर । वरद महोत्कट उदार । ऐसे हे बारा विघ्नेश ।।१५।। अन्यही नाना अवतार । अंगुष्ठपर्वसमाश्रित सुंदर । ऐसें गणेशतीर्थ थोर । गणपप्रिय वर्णिलें मी ।।१६।। ऐशीं असंख्य तीर्थे असतीं । त्यांची अगण्य करण्या गणती । तरीही कांहीं यथामति । सांगतों भक्तियंत्रित मीं ।।१७।। ऋषितीर्थापासून पुढें लागतें । चतुर्थीचें तीर्थ जें होतें । शुक्लकृष्ण गतीचें तें । स्नानें त्यांत चतुर्विध फळ ।।१८।। तदनंतर शमी मंदार तीर्थ उत्तम । नंतर दूर्वातीर्थ पांच धनुष्यें अनुपम । त्यांत स्नानें इच्छित लाभतें मनोरम । देवेशांनो सर्वदा ।।१९।। उत्तर तीरावरी जे असत । तें तीर्थ भैरवप्रिय ज्ञात । नग्नभैरव देवेश वसत । तेथ सदा भक्तिभावें ।।२०।। त्या नग्नभैरव तीर्थांत । स्नान करी जो भावयुक्त । वासनोद्भव दुःख नष्ट होत । तत्क्षणीं नरोत्तमांनो ।।२१।। द्वारकातीर्थ त्यापुढतीं । स्नानमात्रें त्यांत मुक्त होतीं । त्यापुढें अयोध्यातीर्थे असती । मथुरासंश्रित तीर्थ पुढें ।।२२।। त्यांत करिता स्नान । मुक्तिलाभ होऊन । लाभतें ईप्सित पावन । समस्तही सर्वकाळ ।।२३।। त्याच्या उत्तरेस प्रभास । तीर्थ जें स्नान केल्यास । रोगविनाश जीवितास । सद्यः सुखकर होत असे ।।२४।। तदनंतर पुष्करतीर्थ ख्यात । स्नान करितां पाप दूर होत । त्यापुढतीं कावेरिकातीर्थ ख्यात । स्नानमात्रें जें मुक्त करी ।।२५।। विष्णूच्या चोवीस कलात्मक । तीर्थे पापसंघांना दाहक । उत्तर तीरीं प्रतिष्ठित पावक । स्वयं विष्णु भगवान ।।२६।। ह्यांत स्नानमात्रें लाभत । वैष्णवपद भक्तांप्रत । भृगुतीर्थ वसलें त्यापुढें असत । पुलहतीर्थ पापहर ।।२७।। त्यानंतर मुनिगणांची तीर्थे संस्थित । त्यांचेही विस्तार यांत सांगत । ऐका करोनि एकचित्त । वैष्णवतीर्थांचा महिमा ।।२८।। वैष्णाव तीर्थें स्नानमात्रें होत । विष्णुलोकप्रद जगतांत । त्या त्या देवऋषींचीं

तीर्थें वर्तत । त्या त्या लोकांचीं दायक जगीं ।।२९।। त्यांत लय पावतां मानव । शुक्लगतीनें मुक्ति अभिनव । मयूरक्षेत्र माहात्म्यें सर्वथैव । ब्रह्मकमंडलूत स्नानमात्रें ।।३०।। त्या तीर्थाचा जाणा विस्तार । एक धनुष्यपर सर्वत्र । मुनिगणादींचीं तीर्थें अन्यत्र । अंगुष्ठपर्व मात्र जाणावी ।।३१।। सृष्टिनिर्माणप्रारंभीं जात । देवालयीं मुनि देवतीर्थे अवलोकत । तेथ स्वसिद्धीस्तव तप करित । सिद्धि लाभली तयांना ।।३२।। तेव्हां ती स्वस्थानीं परत जातीं । परी कलांशें मयूरेशाजवळी वसती । म्हणोनि त्यांची गणती । अशक्य वाटे वर्णावया ।।३३।। सूक्ष्मचक्षूनें जाणावें । विस्तार तीर्थादिक पहावे । दक्षिण तटावरी विसावे । अवंतीतीर्थ देवमुख्यहो ।।३४।। शुक्रतीर्थ अगस्त्यतीर्थ । सोमेश्वरतीर्थ पिशाचतीर्थ । यमतीर्थ नैर्ऋत्यतीर्थ । हंसतीर्थ तैसे भैरव ।।३५।। महातीर्थ रुद्रतीर्थ । रामेश्वर तीर्थ मल्लिकार्जुनतीर्थ । सीमा सांगतों उत्तरतीर्थ । ज्याप्रकारें वसलें असे ।।३६।। विष्णु अवतारतीर्थ अप्सरातीर्थ । देवतीर्थ गंधर्व तीर्थ । इंद्रतीर्थ अग्नितीर्थ । विष्णुतीर्थ तदंतगम् ।।३७।। दक्षिण तीरीं पापहर । अत्रीचें तीर्थ थोर । एक द्वितत्रितादि तीर्थ पापहर । गणपात्मक हीं असतीं ।।३८।। त्यानंतर शंभूचें महातीर्थ । महेश्वरांनो सीमा स्थित । गणेशाच्या पूर्वभागीं जीं विलसत । तीं तीर्थें येथवर वर्णिलीं ।।३९।। आतां पश्चिमादि भागांत । तीर्थें जीं येथ असत । सुरश्रेष्ठांनो देऊन चित्त । ऐका त्यांचें वर्णन ।।४०।। व्यासतीर्थ काशीतीर्थ । मायापुरी तीर्थ विरजकतीर्थ । कृत्तिवास त्र्यंबकेश शिवतीर्थ । वैद्यनाथादि कांचीतीर्थे असती ।।४१।। तदनंतर कैलासनाथतीर्थ । बारा महिन्यांची तीर्थें अद्भुत । मलमास तीर्थही येथ वर्तत । गणेशप्रिय हीं सारीं ।।४२।। देव गणेश्वर तपश्चर्येनें निर्मित । गणेशपूजन मलमासांत । सर्वार्थसाधक निश्चित होत । ऐसें जाणा महेश्वरहो ।।४३।। तदनंतर शैवतीर्थे असत ।

लक्ष्मीतीर्थ सरस्वती तीर्थ । विष्णुकांचीचेंही तीर्थ । कौमारीतीर्थ तदनंतर ।।४४।। वाराहीचें तीर्थ ऐंद्री तीर्थ । वैष्णवी तीर्थ माहेश्वरी तीर्थ । ब्राह्मी तीर्थ रक्तदंता तीर्थ । तदनंतर तीर्थ वसिष्ठाचें ।।४५।। पौलस्य तीर्थ अंगिरस तीर्थ । कण्वतीर्थ जैमिनीचें तीर्थ । मेधातिथि तीर्थ रक्तदंता तीर्थ । तीर्थ त्यापुढे माधांत्याचें ।।४६।। ययातितीर्थ नहुषतीर्थ । ध्रुवतीर्थ भारद्वाजतीर्थ । जामदग्न्य तीर्थ गौतम तीर्थ । तीर्थ तदनंतर पांडवांचें ।।४७।। वरुणतीर्थ मारुततीर्थ । पितृतीर्थ गयातीर्थ । गया गदाधरासवें वसत । तेथे देवी प्रसन्न ।।४८।। उभयतीर निवासी जन । तिजमुळें होती ब्रह्मपरायण । तेथ करितां पिंडदान । ब्रह्मभूत पितामह होती ।।४९।। क्षेत्रकारणें अन्यही पितर । ऋणमुक्त होती सर्व सत्वर । तो भक्त पावे गति थोर । परम ब्रह्मदायक जो ।।५०।। ह्या पुढतीं मुनितीर्थ अपार । त्यांचें वर्णन अशक्य खरोखर । भैरवतीर्थ स्कंदतीर्थ नंतर । नागेश तीर्थ येथ असे ।।५१।। तदनंतर रुद्र तीर्थ । तैसेंचि संस्थित वसुतीर्थ । पार्वती तीर्थ धनपति तीर्थ । साध्यांचें तीर्थ तदनंतर ।।५२।। शक्तितीर्थ महेशांनो असत । दक्षिणतटीं सीमारूप ख्यात । आतां उत्तर तीरावरीं वसत । व्यासतीर्थे अन्यही ।।५३।। व्यासतीर्थासमीप असत । ब्रह्मदेवाचें तीर्थ प्रख्यात । सर्वपापप्रणाशक ज्ञात । महान तीर्थ ब्रह्म्याचें ।।५४।। कर्मतीर्थ अग्नितीर्थ । द्वादश आदित्यांचीं तीर्थे ख्यात । शिवकांची तीर्थ सूर्य तीर्थ । सर्वरोगसंहारक जें ।।५५।। पूर्णाचें पूर्ण भावतीर्थ । ग्रहतीर्थ दिक्पाल तीर्थें अमित । देवयक्ष राक्षसांचीं असत । असंख्य तीर्थें या क्षेत्रांत ।।५६।। महाकालीचें तीर्थ नरसिंहाचें तीर्थ । शाकंभरी तीर्थ चामुंडा तीर्थ । त्रिपुरातीर्थ येथ असत । महामायायुत शक्तितीर्थे ।।५७।। चौसष्ट योगिनींचीं तीर्थें संमत । योगद परदेहजक तीर्थें वर्तत । तदनंतर नैध्रुवतीर्थ देवल तीर्थ । मार्कंडेयतीर्थ त्यानंतर

।।५८।। भैरवतीर्थ काळभैरवतीर्थ । क्रतुमुख्य प्रजापतींचीं तीर्थें असंख्यात । त्यापुढती रैवतकतीर्थ ज्ञात । योगमय जें परम असे ।।५९।। जडभरततीर्थ योग सिद्धिप्रद । ओंकारनादतीर्थ कीर्तिद । विद्याधरतीर्थ कलाप्रद । त्यापुढतीं पैशाच मोचनतीर्थ ।।६०।। तदनंतर धर्मतीर्थ अश्विनीचें तीर्थ । शेष नागादिकांचेंतीर्थ । शंभर तीर्थें हीं यथार्थ । तदनंतर महातीर्थ गाईंचें ।।६१।। त्यापुढती सनकादींचीं तीर्थे । चौदा मनूंची ही सुतीर्थे । महाशक्तीचें अमिताचें ही तीर्थें । दक्षादींची तैसीच ।।६२।। मातृगणांचीं तीर्थे असती । साठ दक्षकन्यांची तीर्थें विलसती । त्यानंतर गंधर्वतीर्थे वर्तती । गुह्यकतीर्थे त्यापुढती ।।६३।। बिभीषणतीर्थ रावण तीर्थ । श्वेतकेतुतीर्थ उद्दालकतीर्थ । राक्षसतीर्थ अष्टावक्रतीर्थ । वैश्वदेवतीर्थ तदनंतर ।।६४।। सनकादींची तीर्थें वर्तत । धीमान दक्षाचें तीर्थ प्रख्यात । मारीच मौद्गलादींची तीर्थे विलसत । त्यानंतर तीर्थें पांडवेशांची ।।६५।। दुर्वासतीर्थ दत्ततीर्थ । विधानतीर्थ हनुमंततीर्थ । सुग्रीवतीर्थ जांबवनतीर्थ । बलितीर्थ तें त्यापुढती ।।६६।। वालखिल्यतीर्थ गालवतीर्थ । विश्वामित्रतीर्थ त्रिशिरसतीर्थ । मृकंडतीर्थ दधीची तीर्थ । किंनरतीर्थ तदनंतर ।।६७।। साध्यतीर्थ कामधेनु अदितीतीर्थ । अमिततीर्थ ईश्वाकुतीर्थ । गाग्र्यतीर्थ मांडूकतीर्थ । धौम्यतीर्थ तदनंतर ।।६८।। वाल्मीकतीर्थ जैंमिनीयतीर्थ । वाचक्नवी तीर्थ मंकणकतीर्थ । प्रल्हादतीर्थ दधीचितीर्थ । उपमन्युतीर्थ तदनंतर ।।६९।। वैशंपायनतीर्थ जानकीतीर्थ । पर्वततीर्थ पैलतीर्थ । लोमेशतीर्थ विभांडतीर्थ । ऋष्यशृंगतीर्थ तदनंतर ।।७०।। त्यानंतर मुनिगणांचीं तीर्थें असंख्यात । अश्वत्थामातीर्थ कृपाचार्यतीर्थ । वराहतीर्थ भूमितीर्थ । प्रकृतिपुरुषतीर्थ महापत्यातीर्थ तैसे ।।७१।। सीमेवरी तें असत । ऐसी महेश्वरांनो मुख्य तीर्थें ज्ञात । संक्षेपें कथिलीं तुम्हांप्रत । सेवा ती त्या त्या दिनविशेषीं

।।७२।। मयूरवासी जे जन । त्यांस लाभे करिता पूजन । ह्या सर्व तीर्थांचें विधियुक्त ध्यान । विशिष्ट सिद्धि प्रतिक्षेत्राच्या ।।७३।। मयूरक्षेत्रीं तीर्थे अपार । अंगुष्ठपर्व मात्र तीं सर्व । प्रमाण त्रैलोक्यांत अपूर्व । नाना भेदपर तीर्थे ।।७४।। मयूर क्षेत्रांत सर्व तीर्थें स्थित । अणुमात्र स्वरूपें सतत । येथ जीं जीं क्षेत्रें वसत । तीं न जाती कदापि कोठें ।।७५।। आपापल्या स्थानीं राहून । सेविती तीं द्विरदानन । गाणेशक्षेत्रांत जी तीर्थें महान । तेथ देवही राहती तत्संबंधें ।।७६।। मयूरक्षेत्रीं दर्शनार्थ जाती । गजाननासी सेवितीं । ऐसी ही तीर्थांची महती। संक्षेपें तुम्हां सांगितली ।।७७।। ह्या तीर्थमाहात्म्याचें वाचन । अथवा करील तो श्रवण । तो नर भुक्ति मुक्ति लाभून । अन्ती जाई स्वानंदलोकीं ।।७८।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे षष्ठे खंडे विकटचरिते ब्रह्मकमंडलुस्थतीर्थवर्णनं नाम सप्तविंशतितमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय सत्ताविसांवा संपूर्ण)